GR - 200408121253510001 -1700

नागपूर महानगरपालिका क्षेत्रात राज्य शासन क्षेत्रात,म्हाडा, महानगरपालिका, राज्य शासनाचे उपक्रम आणि घोषित खाजगी मालकीच्या जमिनीवरील झोपडपट्टीवासियांसाठी झोपडपट्टी पुनर्वसन योजना राबविण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**गृहनिर्माण विभाग,**

**शासन निर्णय-क्र.झोपुयो-२००२/प्र.क्र.४५१/झोपसू-१**

**मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.**

**दिनांक: २७ ऑक्टोबर, २००३**

**प्रस्तावना:-**

राज्यातील बहुतेक सर्व शहरात औद्योगिकीकरण व त्या अनुषंगाने नागरीकरण झपाट्याने वाढत असून, ग्रामीण भागातून तसेच देशाच्या अन्य प्रांतातून रोजगाराच्या शोधार्थ येणारी लोकांची संख्या दिवसेंदिवस वाढत आहे. नागरी भागातील वाढत्या लोकसंख्येचा विचार करता त्या प्रमाणात घरांची निर्मीती करून लोकांच्या राहणीमानात व जिवनमानात सुधारणा होण्याचा दृष्टिने त्यांना सर्व सुविधायुक्त घर मिळावे असे राज्य शासनाचे धोरण आहे, व त्या दृष्टिने गृहनिर्माण विषयक अनुषंगिक बाबींमध्ये आवश्यक त्या सुधारणा करण्यात येत आहेत. वाढत्या लोकसंख्येबरोबरच घरांची मागणी विचारात घेता राज्यात गृहनिर्माण धोरण प्रभाविपणे राबवून घरांच्या निर्मीतीला गती देणे व घरांची उपलब्धता सर्वसामान्य जनतेच्या मागणीप्रमाणे करणे ही बाब विचारात घेऊन बृहन्मुंबईमध्ये जी झोपडपट्टी पुनर्वसन योजना कार्यान्वित करण्यात आली आहे, ती योजना महानगरपालिकेच्या/नगरपरिषदेच्या विचार करून राज्यातील सर्वच महानगरपालिका, नगरपरिषद क्षेत्रामध्ये राबविण्योत यावी, असा निर्णय शासनाने घेतला आहे. या निर्णयाच्या अनुषंगाने महानगरपालिका/नगरपरिषद क्षेत्रातील प्रचलित विकास नियंत्रण विनियम तसेच योजनेची सुसाध्यता तपासून पाहण्यात येत असून, नागपूर महानगरपालिका क्षेत्रात झोपडपट्टी पुनर्वसन योजना राबविण्याचा संबंधाने खालीलप्रमाणे निर्णय जाहिर करण्यात येत आहे.

## शासन निर्णय:

राज्यात गृहनिर्माण धोरण प्रभावीपणे राबवून घरांच्या निर्मित्तीला गती देणे व घरांची उपलब्धता सर्वसामान्य माणसांच्या मागणीप्रमाणे वाढविणे ही बाब विचारात घेवून, बृहन्मुंबईमध्ये जी झोपडपट्टी पुनर्वसन योजना अंमलात आणली जात आहे तीच योजना नागपूर महानगरपालिका क्षेत्रात कार्यान्वित करण्यात येत आहे.

नागपूर महानगरपालिका क्षेत्रातील राज्यशासन, नागपूर महानगरपालिका, म्हाडा, राज्यशासनाचे उपक्रम आणि खाजगी मालकीच्या घोषित जमिनीवरील झोपडपट्टीवासीयांसाठी झोपडपट्टी पुनर्वसन योजना राबविण्यात यावी.

महाराष्ट्र राज्याचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नांवाने,

( डॉ.सुरेश जोशी )
प्रधान सचिव,गृहनिर्माण विभाग.

प्रति,

१) मा. राज्यपाल यांचे सचिव,
२) मा. मुख्यमंत्री यांचे सचिव,
३) मा. उपमुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
४) मा. मंत्री (गृहनिर्माण) यांचे खाजगी सचिव,
५) मा. राज्यमंत्री (गृहनिर्माण) यांचे खाजगी सचिव,
६) मा. मुख्य सचिवांचे खाजगी सचिव,
७) महालेखापाल, महाराष्ट्र-१, मुंबई (लेखा व अनुज्ञेयता) लेखापरिक्षा,
८) महालेखापाल, महाराष्ट्र-२, नागपूर (लेखा व अनुज्ञेयता) लेखापरिक्षा,
९) प्रधान सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई,
१०) प्रधान सचिव, महसूल व वन विभाग, मंत्रालय,मुंबई,
११) प्रधान सचिव, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई,
१२) उपाध्यक्ष व मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास मंडळ, गृहनिर्माण भवन, वांद्रे (पूर्व), मुंबई-५१.
१३) मुख्य कार्यकारी अधिकारी, झोपडपट्टी पुनर्वसन प्राधिकरण, ५ वा मजला, गृहनिर्माण भवन, वांद्रे (पूर्व), मुंबई-५१.
१४) सर्व विभागीय महसूल आयुक्त,
१५) सर्व महापालिका आयुक्त,
१६) मुख्य कार्यकारी अधिकारी, नागपूर सुधार प्रन्यास,
१७) सर्व जिल्हाधिकारी,
१८) निवड नस्ती/झोपसू-१, गृहनिर्माण विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.